“राजमाता सईबाई स्मृतीस्थळ विकास आराखडा-सार्वजनिक बांधकाम विभागाकडील सुधारीत अंदाजपत्रकास” मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.१०२/का.१४४४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२४.

**वाचा:** १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का.१४४४, दिनांक ०४ जून, २०१५.
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का. १४४४, दिनांक १९ जुलै, २०१६.
३) नियोजन विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक : तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का.१४४४, दिनांक ०२ फेब्रुवारी, २०२२.
४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.१०२/का.१४४४-अ, दिनांक ३० नोव्हेंबर, २०२३
५) जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे यांचे क्रमांक : जिनिस पुणे/नि-६/आराखडा / म.सईबाई /२०२३/३०१४, दिनांक १६/११/२०२३ चे पत्र.
६) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.३४/का. १४४४-अ, दिनांक १२ मार्च, २०२४.
७) जिल्हाधिकारी, पुणे यांचे क्रमांक : जिनिस पुणे/नि-६/आराखडा/रा.सईबाई/ २०२४/३३२, दिनांक ०२/०२/२०२४ चे पत्र.
८) मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील शिखर समितीची चक्राकार पध्दतीने दिनांक १३/०३/२०२४ रोजी प्राप्त झालेली मान्यता.

**प्रस्तावना:**

उपरोक्त वाचा क्र.५ येथील पत्रान्वये जिल्हा नियोजन अधिकारी यांनी “राजमाता सईबाई स्मृतीस्थळ विकास आराखडा” साठी पुरातत्व विभागाकडील कामे रु.२९.७३ कोटी व सार्वजनिक बांधकाम विभागाकडील कामे रु.४३.४४ कोटी अशा एकूण रु.७३.१७ कोटी किंमतीचा प्रस्ताव सादर केला होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने उच्चाधिकार व शिखर समितीच्या मान्यतेने नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.१०२/का.१४४४-अ, दिनांक ३० नोव्हेंबर, २०२३ अन्वये “राजमाता सईबाई स्मृतीस्थळ विकास आराखडयातील पुरातत्व विभागाकडील कामांच्या रुपये २९,७३,४०,०००/- विकास आराखड्यास मान्यता देण्यात आली आहे.

०२. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का.१४४४, दि.०४.०६.२०१५ अन्वये राज्यातील तीर्थक्षेत्र, पर्यटनस्थळ परिसर विकास आराखडा अंतिम करणे व अंमलबजावणीसाठी धोरण/मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्यात आली आहेत. तसेच

दिनांक १९.०७.२०१६ च्या शासन निर्णयान्वये यातील काही तरतूदी/निकष याबाबत स्पष्टीकरणात्मक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

०३. उपरोक्त शासन निर्णयातील तरतूदीनुसार अर्थसंकल्पीय भाषणात नमूद आंतराष्ट्रीय/राष्ट्रीय दर्जाची महत्वाची स्थळे, तीर्थक्षेत्रे परिसर विकास आराखडे यांची व्याप्ती व स्वरूप लक्षात घेऊन, संबंधित आराखडे नियोजन विभागामार्फत राबविण्यात येतात. स्थानिक पातळीवरील सर्व संबधितांशी चर्चा करून विकास आराखडा व त्यास लागणारा निधी याचा आराखडा जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय कार्यकारी समितीने तयार करून तो मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीस सादर करण्यात येतो. उच्चाधिकार समिती विकास आराखड्यास मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील शिखर समितीची मान्यता प्राप्त करून घेण्यासाठी शिफारस करते.

०४. उपरोक्त वाचा क्र. ५ येथील जिल्हाधिकारी, पुणे यांच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, रु.१९,१०,०५,०८३/- इतक्या किंमतीच्या सार्वजनिक बांधकाम विभागाकडील सुधारीत अंदाजपत्रकातील भूसंपादन हा घटक वगळून उर्वरित रु. १६,६०,०५,०८३/- इतक्या किंमतीच्या कामांचा “राजमाता सईबाई स्मृतीस्थळ विकास आराखडयामध्ये” समावेश करण्यासाठी शिखर समितीसमोर मान्यतेसाठी सादर करण्याची शिफारस नियोजन विभाग, शासन निर्णय दि.०४.०६.२०१५ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दि.११.०३.२०२४ रोजी झालेल्या बैठकीत करण्यात आली आहे.

०५. “राजमाता सईबाई स्मृतीस्थळ विकास आराखडा-सार्वजनिक बांधकाम विभागाकडील सुधारीत अंदाजपत्रकास” नियोजन विभाग, शासन निर्णय दि.०४.०६.२०१५ अन्वये तीर्थक्षेत्र/पर्यटनस्थळ विकास आराखड्यास मान्यता देणेकरिता मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील स्थापन करण्यात आलेल्या “शिखर समिती”ची दि.१३.०३.२०२४ रोजी चक्राकार पध्दतीने मान्यता घेण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

“राजमाता सईबाई स्मृतीस्थळ विकास आराखडा-सार्वजनिक बांधकाम विभागाकडील सुधारीत अंदाजपत्रकाच्या रूपये १६,६०,०५,०८३/- किंमतीच्या प्रस्तावाचा समावेश करुन” (पुरातत्व विभागाकडील कामे रुपये २९,७३,४०,०००/- + रुपये १६,६०,०५,०८३/- सार्वजनिक बांधकाम विभागाकडील सुधारीत अंदाजपत्रक) अशा एकूण रुपये ४६,३३,४५,०८३/- इतक्या किंमतीच्या सुधारित आराखड्यास मान्यता देण्यात आली आहे. राजमाता सईबाई स्मृतीस्थळ विकास आराखडा-सार्वजनिक बांधकाम विभागाकडील सुधारीत अंदाजपत्रकाच्या रुपये १६,६०,०५,०८३/- किंमतीच्या प्रस्तावाचा तपशिल खालीलप्रमाणे आहे :

| अ.क्र. | कामाचे नाव | क्षेत्रफळ sqm. | अंदाजपत्रकीय किंमत रुपये |
|---|---|---|---|
| १. | "श्री सईबाई राणी" सरकारसाठी स्मृती स्थळ स्मारक छत्री ओव्हरी खुले संग्रहालयसह प्रवेशद्वार,दगडी फ्लोअरिंगसह,अंगण,नगरखाना | १,११३,२९ | ७,१८,३१,६०४.०० |
| २. | हेरिटेज घाट विकास, आर.सी.सी. भिंत, नदीच्या पात्रापर्यंत दगडी पाया, दगडी पायऱ्या (घाट),सजावटीचा बुरुज (बुरुज), सजावटीच्या कमानी | २५००.०० | २,३२,१५,३८८.१० |
| ३. | मुख्य रस्त्यापासून स्मृती स्थळापर्यंत व दगडी फरसबंदी स्मृती स्थळ ते राजवाडा, पाल. | २०००.० | १,१९,८१,५६०.३४ |
| ४. | क्षेत्र विकास आणि पर्यटन सुविधा, प्रवेशद्वार प्लाझा, कमान, पार्किंग क्षेत्र, फूड कोर्ट - | | ------ |
| | Electrification | | १,६०,५४,२८३.०० |
| | १८% GST | | २,२५,१९,७४२.०० |
| | Labour Insurance १ % | | १२,५१,०९७.०० |
| | Testing of Material | | १,०३,८०५.०० |
| | Royalty | | १९,२३,०३६.०० |
| | Consultancy Fees | | २१,४०,५७१.०० |
| | Contingencies | | ४२,८१,१४२.०० |
| | Price Escalation | | १,०७,०२,८५५.०० |
| | **Total** | | **१६,६०,०५,०८३.००** |
| | १८ % GST, Royalty Insurance २%, Architect ३%, Price Escalation १०%   Total = ३३% | | |

०२. मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील स्थापन करण्यात आलेल्या “शिखर समितीने” दि.१३.०३.२०२४ रोजी चक्राकार पध्दतीने दिलेल्या मान्यता दिल्यानुसार प्रशासकीय मान्यतेचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

०३. राजमाता सईबाई स्मृतीस्थळ विकास आराखड्यांतर्गत समाविष्ट करण्यात आलेल्या सदर कामाच्या अंमलबजावणीबाबत सर्व तरतूदी नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.१०२/का.१४४४-अ, दिनांक ३० नोव्हेंबर, २०२३ मधील मूळ आराखड्याच्या शासन निर्णयाप्रमाणे लागू राहतील.

०४. सदर समाविष्ट कामाची अंमलबजावणी सन २०२३-२४ या वर्षापासून अंमलात येईल. सदर प्रस्तावातील कामांवर येणारा खर्च "मागणी क्र.ओ-१०, मुख्य लेखाशीर्ष ५४५२, पर्यटनावरील भांडवली खर्च, ०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा,१०१-पर्यटन केंद्र, (००) , (००) (१५) तीर्थक्षेत्र व पर्यटनस्थळ विकास आराखडा (कार्यक्रम/दत्तमत) (५४५२ ०२११)" या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४१९१९२२७११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2024.03.14 19:29:16 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री ह्यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मुंबई,
४. मा. उपमुख्यमंत्री (गृह व जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मुंबई,
५. मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, ( सर्व )
६. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. मा. संसद सदस्य /विधानसभा/ विधान परिषद सदस्य, (सर्व)
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
९. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, (सर्व)
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१,मुंबई,
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
१२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३. महाव्यवस्थापक, मध्य रेल्वे, मुंबई.
१४. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
१५. जिल्हाधिकारी, पुणे.
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
१७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
१८. मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, पुणे
१९. मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग, पुणे
२०. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे
२१. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई.
२२. उप संचालक, पुरातत्व विभाग, पुणे
२३. निवड नस्ती (का.१४४४-अ), नियोजन विभाग.